श्री.

# सर्वसंग्रह मासिकपुस्तका-
# पैकीं पदसंग्रह.

## भाग २ रा.

हें पुस्तक,

**रावजी श्रीधर गोंधळेकर**

यांनीं

आपल्या "जगद्धितेच्छु" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

पुणें, पेठ शनवार मेहुणपुरा.

ता० १ सप्तंबर १८९७ इसवी.

आवृत्ति १ ली.

किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.



या ग्रंथांत अनेक भगवद्भक्त सत्पुरुषांचीं भक्ति ज्ञान वैराग्यपर पदें रागांसहित घातलीं आहेत. पदांची भाषा फार सुरस आहे. आह्मीं उत्तम माहितगार शास्त्र्यांकडून हा ग्रंथ शुद्ध करवून छापिला आहे. या ग्रंथाच्या वाचनानें बहुतकरून लोकांची सन्मार्गाकडे प्रवृत्ति व्हावीच अशीं उत्तम पदें यांत आहेत. एकंदरींत हा ग्रंथ संग्रहीं ठेवण्यास फारच योग्य आहे. सर्व लोकांस घेण्यास सुलभ पडावा ह्मणून या ग्रंथाची किंमत अवघी १२ आणे ठेविली आहे.

रावजी श्रीधर गोंधळेकर.

---

# अनुक्रमणिका.



# विक्रीस तयार.

# हरिदास बत्तिशी.

कीर्तनकार कीर्तनांत, श्रोते मंडळींत हास्यरस उत्पन्न करण्याकरितां ज्या नकला व गोष्टी सांगतात, त्यांचा संग्रह यांत केला आहे. शीण आला असेल अशा वेळीं मनाची करमणूक करण्यास हें पुस्तक फार उपयोगाचें आहे. यांतील कित्येक गोष्टी पोट धरवरून हंसल्याखेरीज वाचून संपतच नाहींत. या पुस्तकाच्या वाचनानें थोडा तरी बहुश्रुतपणा आल्यावांचून रहाणार नाहीं. किंमत ८ आणे. ट. हं. १ आणा.

---

# कीर्तनतरंगिणी.

## भाग १ ते ४.

या चारी भागांत अनेक प्रकारचीं आख्यानें असून, चारी भाग णाऱ्या हरिदासांस कीर्तन करण्याकरितां दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाची जरूर लागणार नाहीं, अशी यांत योजना केली आहे. किंमत प्रत्येकीं १४ आणे, १ रुपया २ आणे, १४ आणे व १ रु०. शिव

# सुभाषित संग्रह.

## भाग १ ते २.

नवीन ग्रंथ लिहिणारे, सभेंत व्याख्यानें देणारे, कीर्तन करणारे, पुराण सांगणारे व चार मंडळींत बसून गोष्टी सांगणारे लोक यांस तर ह्या पुस्तकाच्या वाचनापासून पुष्कळ फायदा होईलच. परंतु क्षणभर एकांतांत बसून जे कोणी हें पुस्तक वाचतील त्यांस सुद्धां या पुस्तकाच्या वाचनानें अत्यानंद झाल्यावांचून राहणार नाहीं. किंमत प्रत्येकीं १ रुपया, टपाल खर्च प्रत्येकीं २ आणे.

---

# भागवतसारामृत.

श्रीमद्भागवतासारखा परम पूज्य असा दुसरा ग्रंथच नाहीं. तो अतिशय मोठा व मूळ संस्कृत असल्यानें प्राकृतांस त्याचा उपयोग होत नाहीं. ती उणीव ह्या ओंवीबद्ध ग्रंथानें भरून काढिली आहे. प्रत्येक हिंदूनें एक वेळ हा ग्रंथ अवश्य वाचावा. किंमत ४ रुपये, ट. ख. १० आणे.

म्यानेजर जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

श्री.

# सर्वसंग्रह मासिक पुस्तका-पैकीं पदसंग्रह.

## भाग २ रा.

## विठ्ठलपंत.

### पद १.

### शंकराचें ध्यान.

ध्यावा परब्रह्म शिव सांब ॥ स्फटिकसन्निभप्रभ, शुभभस्मोद्धूलितविग्रह, बालबालरुद्राक्षमालिकाबद्धपिंगटोत्तुंग—जटाजूट, घटतटांत परिसर रिंगद्गांगतरंगशेखर, स्रवदमृतद्रव—विलसदर्धशशिबिंब ॥ ध्यावा परब्रह्म शिव सांब ॥ १ ॥ मृगमदतिलकितभव्यकेश, त्रिपुंड्रभालज्वलज्ज्वलनशिख, भुजगकुंडलोद्भासि—गंडयुग, करुणारससंपूर्ण कमलदल—विशालनयनत्रयीत्रयीमय, तिलककुसुममनोहरनासिक, इंदुवदननवकुंदरदन, शुचिमंदमधुरतरहासचंद्रिका—विकसत्सदधरबिंब ॥ ध्यावा० ॥ २ ॥ इंद्रनीलमणिसमगल, कंदर्पपीनबंधुरस्कंध, चंदनद्रवपरिरूषित, भव्यसहचरस्वर्णकटककेयूर-तोडरांगुलीयभूषितकृतककुरंग, कुठारवराभयलांछितवांछितदानसम-

र्थक, मूर्तपरमपुरुषार्थचतुष्टयवाह, निर्बर्हितदुष्टदनुजजनदंभ ॥ ध्यावा० ॥ ३ ॥ वक्षस्थल अतिविशालउदरवलित्रयबंधुर लक्षुस्थूलरुद्राक्ष, कलितनागेंद्रहार, नागेंद्रयज्ञ गुण, मधुरगंधकल्पद्रुमकुसुमोदारहारपरिलुम्यत्सत्तमचित्तमत्तरोलंब ॥ ध्यावा० ॥ ४ ॥ आदिशक्ति वामांकीं शोभे, मृतजंभारिप्रमुखकुटुंबा शुभामरवक्रनसंरंभा, पालितनिजपदभक्तकदंबा, रोलंबाभचिकुरनिकुरबा वदनविडंबित शशधरबिंबा, मंदहास मधुराधरबिंबा, कुंकुमसंभावितकुचकुंभा, कौसुंभांबर—लसितनितंबा, श्रीजगदंबा, दक्षिणभागीं, ब्रह्मत्रयपदसार्वभौमसाम्राज्यसनाथस्वामिषडानन करपल्लव संलालितखेलद्वालवेषहेरंब ॥ ध्यावा० ॥ ५ ॥ व्याघ्रचर्मपरिधान कटितटीं नागबद्ध—परिणद्ध बद्ध पद्मासन सुंदर जानुजंघ अवगढ, गुल्फयुग वृत्त वृत्त उत्तुंगरक्तनख चरणयुगल, यत्क्षणिकचिंतनें झटिति तुटति भवबंध समग्रहि नलगे क्षणहि विलंब ॥ ध्यावा० ॥ ६ ॥ *इंद्र वन्हि यम वरुण समीरण कुबेर रक्षो यक्ष सिद्ध विद्याधर किन्नर साध्य सर्प गंधर्व अप्सरा सनक सनंदन सनत्कुमार सनातन नारद वेदचतुष्क षडंगसंयुत ब्रह्मा गौतम वामदेव हरि बाण बृहस्पति अत्र्यगस्त्य शुक शुक्र दधीचि भार्गवराम सुकेशि भृंगि रिटि मृकंडसुत दुर्वास मातृगण नंदिकेश्वर चंडीश दशास्य प्रभृति शांभव स्तविति पूजिती स्तविति चिंतिती करुणापूर्णदृगंतसंतशंतम संतत पंतविठ्ठला देत अंतरालंब ॥ ७ ॥ इति श्रीमच्छंकरपदारविंदमिलिंदायमानमानसेन पं विठ्ठलशर्मणा विरचितं श्रीपार्वतीशंकरध्यानम् सम्प्राप्तम् ॥

## पद २.

### महालक्ष्मीचें ध्यान.

ध्यावी मनीं जगज्जननी ॥ श्रीविष्णुची पट्टराणी ॥ दुस्तरभवसागरतरणी ॥ नवलावण्यपुण्यखाणी ॥ ध्रु० ॥ कनक–भासुरा अरालचाकुरा बिंदिबिजवरा चंद्रकोर केवडा राखडी नागलिंग भगभृंगपुंगवसागीशेवतीकुसुमपंक्ति रमणीय पंचवृद्धजगसुभगवेणी॥श्रीविष्णुची पट्टराणी ॥ १ ॥ कुंकुममृगमदतिलकितभाला कामचाप–कुटिल भ्रूयुगला कर्णांतायत कारुण्यामृतभरित–लोचना कर्णपूर–कर्णिका बालिका सरलनासिका–प्रांत–लसन्माणिक्य–मौक्तिका मंदस्मित सद्विकचकपोला बिंबविडंबिसुधास्त्रवदधरा कंबुकंधरा कुंद–कुड्मलोपमसमरदना शारदचंदिर–सुंदरवदना मंजु जियेची अमृत–मधुरवाणी ॥ श्रीविष्णुची० ॥ २ ॥ मंगलसूत्र टिका ग्रैवेयक मुक्ता पोतक हार पानडी सरी परिष्कृत–वक्षा श्रीहरिनखक्षतांकित कुंकुम–पंकिल पीनपयोधरलुंठन्मौक्तिकोदार–हारपुत्तलिकामाला चंद्रहार मणिमालभारि तनु रोमराजिका त्रिवलिभंगुरित कृशतर–मध्या निम्ननाभि– ह्रद सिंहराजकटि पृथुलनितंबासंगिमेखला रण–मणिश्रेणी ॥ श्रीविष्णुची०॥३॥ कनकतंतु घनभक्तिप्रांतक पीतकंचुकोद्दाम हेम केयूर चंदनागरु केशरकृत कर्दमरूषित गोट पाटल्या वलयजवे तोडरादि भूषित खेटगदा मातुलिंग चषकोद्भासि–चतुर्भुज किसलय मृदुलारुणतल मणिमय मुद्रालंकृत शरणागतजन–वैविधवरद–पाणी ॥ श्री० ॥ ४ ॥ कटीतटीं जरिकांठिकुसुंबी. कौशेयांबर रंभा–स्तंभविडंबकरोरू जानुजंघ समसंगतघोटी वल्गु–

गुल्फयुग मृदुलपार्ष्णितल वलयतोडरोज्वल मंजुल सिंजानहीरमंजीर-परिष्कृत मधुररणज्जोडवीं विरोद्या गेंदविराजित दीर्घ सरल ललितांगुलिनखमणि पुण्यचंद्रिका चिंतकजनतापत्रयकृंतन संतवंदितानंतसुखद मदमंथन संतत पंतविठ्ठला ठाव तया चरणीं ॥श्रीविष्णु॥५॥

## पद ३.

## रामाचें ध्यान.

जयजयरामभद्रभगवन् ॥ त्रिभुवनसार्वभौमभूमन् ॥ विमलागण्यपुण्य महिमन् ॥ सत्तारकब्रह्मनामन् ॥ ध्रु० ॥ अतसीकुसुमश्याम मनोहर ॥ मन्मथसुंदर ॥ पंकेरुहनवपलाशपेशलपादयुगुल नखरत्नचंद्रिकाधवलितदिक्चक्रवाल मंजुलसिंजन्नूपुर पीतवसन परिलसत्किंकिणीमणिगणपरिणताकिरणचित्रदामन् ॥त्रिभु०॥१॥ जयजयपापतापवारिन् ॥ रत्नविशालमालधारिन् ॥ मुनिहृत्पद्मसद्मचारिन् ॥ दुर्जनसर्पदर्पहारिन् ॥ नलिननाभ रोमालिमलिन वलिनम्रजठर हरिन्मणिप्रभस्तन बृहत्कपाटविशंकटवक्षःपीठपीवरस्कंध नंदनद्रुमोत्थसुमनोहारविराजित मलयजर्चित वलयविभूषित बाहुयुगुलपरिकलितललितशर जरठकमठवरपृष्ठघोरधन्वन्॥त्रिभु०॥२॥ जयजयभक्तजनत्रातः ॥ निर्मलतरज्ञानदातः ॥ स्वामिन्सर्वलोकधातः ॥ भावुकबालवंद्यमातः ॥ कुंबुप्रतिभटकंधर सुंदरतनुहनुमंडल चारुचिबुकबिंबाधर मंदस्मिताविकसितशशलांछनशकलकपोल सुनासिक कुंदकुड्मलाग्रदन् सरसिजप्रसन्नलोचन मणिमयकुंडल मृगमदतिलकितविशालभाल कुटिलतरकुंतल मणिगणखचितस्वर्णकिरीट स्थूलमौक्तिकावतंस विलसितसकलसौख्यधामन्॥त्रिभु०॥३॥जयजयपूर्णकृपासिंधो॥

भवदवतप्तदीनबंधो॥सज्जनचक्रपद्मबंधो॥मूर्तप्रणवनादबिंदो॥त्रिजगन्मंगळ अनंगजनितरमंगळनशन जगद्वंद्य जगदाद्य निखिलवेदांतवेद्य अनवद्यरूप सद्भक्तिनम्रतनुसुरासुरव्रजकिरीटसन्माणिमरीचिनीराजितपदनीरज नित्यनिरंजन निर्गुण निष्क्रिय निष्पपंच निर्वासन निर्भय निर्विकल्प निर्माय निरामय निश्चल निर्मल शुद्धबुद्धपरिपूर्णपरात्पर जय दाशरथे सीतावल्लभ जय नारायण रावणमर्दन जय सर्वोत्तम राम रघूत्तम अनंतशंतम पंतविठ्ठलत्राणवज्रवर्मन् ॥ त्रिभु०॥४॥ इतिश्रीमद्राजाधिराजरामचंद्रपदद्वंद्वमिलिंदायमानमानसेन पंतविठ्ठलशर्मणाविरचितं जयजयकार ध्यानं समाप्तम्.

## पद ४.

मुक्ताफलपरिकलितोत्तंसपरिष्कृतपार्श्वमयरत्नविकस्वर रत्नविकसित युगपत्प्रोद्यत्सहस्रभास्करकरमदतस्कर कार्तस्वरमय भास्वर मुकुटं संबिभ्राणं ॥ १ ॥ भोश्चेतः सीतारमणं चिंतय सगुणं प्रभुमतिकरुणं दीनोद्धरणं त्रिजगच्छरणं भोश्चेतः ॥ ध्रु० ॥ जलदश्यामलं कुटिलकुंतलं केशरमृगमदतिलकितभालं रत्नकुंडलं विमलकपोलं श्रवणसीमसंचारिसरसिज प्रसन्ननयनं तिलकुसुमोपम रुचिरनासिकं शारदचंदिर सुंदरवदनं कुंदरदनं मंदस्मित पीयूषलहरिकाधवलित विद्रुमशकलात्युत्तम रक्तिमबिंबाधरवर चुबुकं रेखात्रितय मनोहरकंठं कौस्तुभनायक मुक्ताफलमय हाराभरणं भोश्चेतः ॥२॥ अलक्ष्यजत्रुवैदेहीघन पीन पयोधर—कुंकुमपंकिलहृदयकपाटं स्वर्णतंतुघनभरित प्रांतोत्तरीयशाटं चामीकरमययज्ञसूत्र सत्प्रभामेदुरं त्रिवलिभंगुरं गभीरनाभीविवरसुंदरं शतकोटि ब्रह्मांडमंदिरं तनुरोमालिचम-

त्कृतिरुचिरं दधानमुदरं मंजुल गुंजारव युवषटपदपुंज पंजरायित तनुघुसृणांगरागपिंजर कल्पद्रुमनव कुसुम तुलसिका तरुण मंजरी पदाग्रचुंबककलंबस्त्रक निकुरंबकसंभवदंबर संभरणक्षमडंबर मधुरपरिमलोद्गार विहरणं भोश्वेतः ३ पीनस्कंधा जानुदीर्घकनकांगद तोडरकेटकविराजित कुंकुमसृगमदगर्भितचंदनकर्दमचर्चितभुजगसुभगभुजमभिनवतामरसप्रभकरतलमंगुलीयपरिकालितललितसरलांगुलिमिंदुद्युतिहरनखरंवामेदधतंजरठकमठवरपृष्ठकठोरंघोरतरासुरकृतांतदंडं वरकोदंडं दक्षेबाणं राक्षसलक्षप्राणप्रहरणविद्वदवृंदत्राणवितरणं भोश्वेतः॥४॥मंजुलसिजत्क्षुद्रघंटिकाराजिविराजितमणिमयशृंखलसत्कटितटपुरटघटितपट वाससुवासितपीतपटं विपुलोरुद्विनयं मांसलतरजानुजंघमजरं रत्नतोडरं मंजुमंजु सिंजाननूपुरं फुल्लहल्लकारुणध्वजांबुजवज्रांकुशलांछनाढ्यमृदुतल वृत्तोत्तुंगसुधाकरसोदरनखरचंद्रिकाध्वस्तमहत्तमहृदयांधतमसजनक नंदिनीकोमलतरकरकमलकिसलयात्यंतविलक्षणनवक्षणप्रदविश्वनाथमौल्यलंकरणदुश्चरणसंभवश्रमणहरणभवतरणकरणसुखावितरण निपुणक्षणस्मरणसद्रक्षणशोभन लक्षणचरणं भोश्वेतः ॥ ५ ॥ सीतालक्ष्मणभरतबिभीषणशत्रुघ्नांगदसुगलजांबवत्पनसहनूमद्गवाक्षगजनलनीलसुषेणद्विविदमैंदशरभश्रीनारदसनकसनंदनसनत्कुमारसनातनशौनकवसिष्ठगौतमवामदेववाल्मीकिव्यासागस्त्यपुरंदरपावकपितृपतिनिर्ऋतिवरुणपवनद्रविणेश्वरशंभुब्रह्मानंतयक्षरक्षोगणचारण गुह्यकपन्नग किन्नर विद्याधररंभाद्यैः कृतपरिचरणं भोश्वेतः ६ केशव माधव नारायण संकर्षण वामन विष्णोलक्ष्मीधर दामोदर सीतावल्लभ सरसिजलोचन सर्वजनेश्वर सर्वोत्तम सर्वांतर्यामिन् शरयूतीरविहारिन् स्वा

मिन् हे कौसल्यानंदविवर्धन दुर्जनमर्दन रामजनार्दन कार्मुकपाणे करुणासिंधो रामराम जयराम रघूत्तम मूढेस्मिन्मयि करुणां कुरु कुरु घोरतरे संसारसागरे लीनं दीनं बुद्धिविहीनं त्वमुद्धरोद्धर एवं निगदत्करुणं करुणं भोश्चेतः ॥ ७ ॥ यः शिव इति शैवागम गदितोजैनैरर्हन्नितिसंप्रोक्तो बुद्धैर्बुद्ध इति व्याख्यातः कर्मेत्येवं मीमांसायां कर्तेत्येवंतर्के भणितः सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्माचलमव्यक्तं यमप्रमेयममलं नित्यं शुद्धं बुद्धं शाश्वतमव्याहतमाद्यंतविरहितं नित्यानंदंपरमंपदमिति सर्वासामुपनिषदां योर्थः सः श्रीरामः सीतापतिरितिमत्वा तं प्रत्येवात्मानं सर्वस्वेन निवेदय वंदय लोकय वर्णय कर्णय अर्चय चर्चय तर्पय सर्पय सततं साध्वसाधुवाकृतं समर्पयनिर्वाणसमयपरमसरवीं श्रीराम तापनीयोपनिषदमनुशीलय निपुणं भोश्चेतः ॥ ८ ॥ किंचापल्यं कलयसि विषया ननुभवितुं सुखलेशाभासान त्यायासान् रौरवादिनारकगतिहेतूनेतान् सत्यजमातरमिवपरकीयान्दारानावेलकमिवपरकीयधनं हालाहलमिवपरापवादं पारुष्यं चानृतमपिपरिहर कामक्रोधाद्यरिषड्वर्गं निर्मूलं जहिव्रतसखिचेतो बहुविधपापवशादुच्चावचयोनिषुबहुशो भ्रामंभ्रामंदैवादस्मिन् भारतवर्षे मानुषयोनिः पौरुषदेहश्चेंद्रियपटुता सत्येतावति नित्यानंदे करुणाब्धिावास्मिन् श्रीमत्सीतानाथे विमुखो भूत्वा शिवशिव किं रे पुत्रकलत्रोदरभरणार्थं वित्तचित्तभूमत्त भूपपरिचर्यारसिको भ्रमसि विदिशिदिशिकिंचनिश्चितं नित्योहं निर्विकल्पकोहं शुद्धोहं ब्रह्मास्मिकेवलमित्यमृतोपमसद्भावनयारहितः स्वहितच्छेदकुठारं घोरं कलयसि बलवान्कुलवान् धनसंपन्नःसुभगस्तरुणोविद्वांश्चतुरोहमेवनान्यः कश्चिन्मत्सदृशोलोकेस्मिन्नेवं

निर्भरगर्वपर्वतारूढो मूढो नियतं निरयेनिपतेस्तस्माद्रेरे भ्रातश्चेतस्त्वरितं साधुसंगमंगीकुरु कुशलं त्यज त्यज त्वं दुरंतचिंतनमंतस्तनमुपयाहि शंतमं राममनंतं संप्राप्तोयं हंत संततंपंतविठ्ठलस्त्वामयि शरणं भोश्चेतः सीतारमणं चिंतय सगुणं प्रभुमतिकरुणं दीनोद्धरणं त्रिजगच्छरणं भोश्चेतः ॥ ९ ॥

## पद ५.

## व्यंकटेशाचें ध्यान.

श्रीमच्छेषशैलवासं ॥ नीगजयेश्रीनिवासं ॥ त्रातस्वपदपद्मदासं॥ नीरदभव्यदिव्यभासं ॥ ध्रु० ॥ चिभ्राणंशतरविप्रतिभटं ॥ हीरखचितचामीकरमुकुटं ॥ भृंगप्रभकुटिलालकजालं ॥ कुंकुममृगमदतिलकितभालं ॥ भ्रूविभ्रमकृतकार्मुकजननं ॥ इंदीवरदलविशालनयनं तिलकुसुमप्रतिमोत्तमनासं बिंबविडंचनकृदधरभासं ॥ स्निग्धामलतलमंडमंडलं ॥ कर्णयुगार्पितमकरकुंडलं ॥ शारदचंद्रमनोहरवदनं ॥ कुंदसुंदरप्रभाग्ररदनं ॥ स्वजनानुग्रहसूचिमंदहासं ॥ नीरा० ॥ १ ॥ कंबुकंठमतिपीनस्कंधं ॥ दृग्गोचरजत्रुस्थलबंधं ॥ चंदनचर्चितविशालवाहं॥ अभयवरादिदरायुधवाहं ॥ धृतकनकांगदकटकतोडरं ॥ विदलितहीरकणप्रतिनखरं ॥ श्रीवत्सश्रीहृदयकपाटं ॥ विद्युत्पिंजराचोलितशाटं॥ उरःपीठलुठदुत्तरहारं ॥ त्रिवलिवंधुरिततुंदिलजठरं ॥ प्रपदचुंबिनवसुमनोमालं ॥ नाभिजातचतुराननबालं ॥ कटिसुत्रटितअतिपीतपटन्यासं ॥ नीरा० ॥ २ ॥ सौरभलुम्यद्भ्रमरकदंबं ॥ मणिशृंखलपरिरंभिनितंबं ॥ परमरुचिरपीवरोरुभंगं ॥ रम्यजानुमतिपेशलजंघं ॥ वलयकलितघनकनकतोडरं ॥ मंजुमंजुसिंजाननूपुरं ॥ मृदुलपार्ष्णिसरलां-

गुळिचरणं ॥ दुस्तरतरभवसागरतरणं ॥ विलसन्नखमणिपुण्यचंद्रिकं ॥ निरस्तविनतानादितंद्रिकं ॥ श्रीभूदेवीचमरवीजितं ॥ नारदशुकसनकादिपूजितं ॥ पंतविठ्ठलत्रासगणग्रासं ॥ नीराजयेश्रीनिवासं ॥ ३ ॥ इति व्यंकटेशनीराजनध्यानम् ॥

## पद ६.

आयकें द्रुपदनृपतनये, मज वरिलें श्रीयदुरायें ॥ ध्रु० ॥ मत्पिता विदर्भाधिपती, भीष्मक या नामें नृपती ॥ शर्मप्रद कर्मठ सुमती, धर्मशील निर्मलकीर्ती ॥ तत्साविध विप्रकृत सुकृती, प्रस्तवप्रसंगें सुदती ॥ चाल ॥ यदुराज दीनजनबंधू ॥ सज्जनकुलकुमुदवनेंदू ॥ स्मर सुंदर करुणासिंधू ॥ वर योग्य श्रवणपथा ये ॥ आयकें० ॥ १ ॥ तैंपासुनि साजणि माझ्या, मनिं रुचला यादवराजा ॥ कधिं होइन त्याची भाजा, मनि उपजलि असि निर्व्याजा ॥ वडिल हेंचि ह्मणती योजा, कीं संमत साधुसमाजा ॥ चाल ॥ हेकाड येक परि दादा, रुक्मया करुनि अतिवादा, निंदुनियां बहुत मुकुंदा, शिशुपाल योजि अन्यायें ॥ आयकें० ॥ २ ॥ नेमुनियां विवाहकाळा, धाडिलें मूळ शिशुपाळा ॥ सवराड संभ्रमें आला, तो कुंडिननाम पुराला ॥ उद्वेग जहाला मजला, रोंचला उरीं जणु भाला ॥ चाल ॥ पत्रिका लिहिलि निजकार्जी ॥ द्विज सुदेव करुनी राजी, धाडितां द्वारकेमार्जी ॥ पवनसा जवन तो जाये ॥ आयकें० ॥३॥ दुबळिची विनंती विनयें, कळविली सुदेवें सदयें ॥ अवधारुनि निश्चलहृदयें, अंकूर दयेचा उदये ॥ कळवितां न कोणासहि ये, प्राणेश निघाला सदये ॥ चाल ॥ दारुकें आणिला नामी ॥ रथरा-

ज समीरणगामी ॥ आरोढुनी त्रिजगत्स्वामी ॥ मजसाठिं आला ल- वलायें ॥ आयकें० ॥ ४ ॥ होताही गाजी वाजी, बलदेवराव भा- वोजी ॥ घेउनियां सेना ताजी, गर्जत पार्थि रथ गज वाजी ॥ पात- ले कुंडिनामाजीं, भीष्मक त्या सादर पूजी ॥ चाल ॥ वाटला शि- वाला थारा ॥ आटला संशय सारा ॥ दाटला कंठ जलधारा ॥ नयनिं ये मनिं न सुख माये ॥ आयकें० ॥ ५ ॥ लागली हळद शुभ-काळीं, वाद्यांची विविध धुमाळी ॥ न्हाणुनियां साडी पिंवळी, चोळीवर मुक्ताजाळी ॥ नगशत नथ बुगडी बाळी, मंडवळी मळवट भाळीं ॥ चाल ॥ लेववुनी मज अनुरागें ॥ वैवाहिकवैदिकमार्गें ॥ स्वस्तिवाचनादिक अंगें ॥ सारिलीं नृपाळें न्यायें ॥ आय० ॥ ६ ॥ अंबिका पूजनासाठीं, निघतांना झाली दाटी ॥ रक्षणार्थ मम भटको- टी, चहूंकडे चाळिती दृष्टी ॥ मागधादि घेंडें मोठीं, चेदिपसहित ज्यांचे पोटीं ॥ चाल ॥ वाद्यसंघ गाजत वाजे ॥ खेटले पहाया राजे, मध्यें स्त्रीवृंद विराजे ॥ त्यांत मी चालिलें पायें ॥ आ० ॥७॥ अंबिका वंदिली द्वारीं, पूजिली विविधउपचारीं ॥ मी दीन देवि अवधारीं, करि मजला हरिची नवरी ॥ शिशुपाल दुष्ट धिक्कारीं, हा प्रसाद मज विस्तारीं ॥ चाल ॥ प्रार्थुनियां ऐसें निघतां ॥ क्षि- तिपतितति पहातां पहातां ॥ मोहिली मजकडे पहातां ॥ यदुराज दयेचे छाये ॥ आ० ॥ ८ ॥ प्रभुनें जन कोणि न गणिला, मज समीप निजरथ अणिला ॥ देखतांचि तत्पदकमला, वाटलें नमावें विमला ॥ तंव सदयें निजकर दिधला, घेतलें रथावरि मजला ॥ चाल ॥ निजसैन्यसहित रथ हाकला ॥ सिंहनाद कटकीं पिकला ॥

आनंद जहाला सकळां ॥ चालले संभ्रमोत्साहें ॥ आ० ॥ ९ ॥ नेतांचि हरुनि नृपबाला, कोलाहल बहुतचि झाला ॥ परतूनि न्याव-या मजला, मागधादि भट झट उठला ॥ झटला बहु केला खटला, परि समरीं मागें हटला ॥ चाल ॥ मंडवळी बांधुनि बसला ॥ शि-शुपाल सर्वथा फसला ॥ मनिं विषादविषधर डसला ॥ परि जाय घरा निरुपायें ॥ आ० ॥ १० ॥ चवताकुनि रुक्मीदादा, धांवला भिउनि अपवादा ॥ गांठुनि त्वरित गोविंदा, मांडिली मुखावरि निंदा ॥ झुंजला करुनि निर्बंधा, शेवटीं पावला बंधा ॥ चाल ॥ क्रोधाकुल-यादवमल्लें ॥ क्षुरधारतीक्ष्णतरभल्लें ॥ भादरुनी दोनी कल्ले ॥ दाविलें कुतुक निजजाये ॥ आयकें० ॥ ११ ॥ इतुक्यांत भावोजी आले, पाहुनि ते अनुजा वदले ॥ अनुचित हें अजि त्वां केलें, यदुकुळास लांछन आलें ॥ ऐसें बहु रागें भरले, रुक्मियासि सोडुनि दिधलें ॥ चाल ॥ रिपुकटक सकट माघारें ॥ घटिकेंत हट-विलें सारें ॥ स्वभटोत्कट जयजयकारें ॥ द्वारके आलों उत्साहें ॥ आ० ॥ १२ ॥ भीष्मकादि मंडळि सारी, द्वारकापुरामाझारीं ॥ पा-तले विविध संभारीं, करपीडन विधिसंस्कारीं, वर्तले सोहळे भारी, प्रभु भक्तकाजकैवारी ॥ चाल ॥ मीं त्याचीं श्रीपदपद्में ॥ सेवाविं निरंतर नेमें ॥ कवि पंतविठ्ठल प्रेमें ॥ हरिचरित दुरितहर गाये ॥ आयकें० ॥ १३ ॥

## पद ७.

शुद्धबुद्ध परिपूर्ण परात्पर ॥ जय परमेश्वर उरगशयनकर ॥१॥ प्रलयपयोधौ मीनरूपधर ॥ जय वैवस्वत मुनिहिततत्पर ॥ २ ॥

सागरमथने कूर्मरूपधर ॥ जय मंदरधर सुरवरसुखकर ॥ ३ ॥ व-
राहविग्रह जय भूद्धारक ॥ हिरण्याक्षदितिकुमारमारक ॥ ४ ॥
जय नरसिंह हिरण्यविदारण ॥ प्रऱ्हादपरित्राणपरायण ॥ ५ ॥
जय बटु वामन बलिबंधनकर ॥ शक्रसुखप्रद भुवनमनोहर ॥ ६ ॥
परशुराम जय भृगुकुलदीपक ॥ हैहयघातक क्षत्रकुलांतक ॥ ७ ॥
जय रघुनंदन सीतानायक ॥ रावणकंदन सत्सुखदायक ॥ ८ ॥
जय कृष्ण विभो व्रजपतिपालक ॥ कंसध्वंसक पांडवपालक ॥ ९ ॥
जय बुद्धविभो असुर विमोहन ॥ योगिकुलेश जिनप्रियनंदन ॥१०॥
जय कलंकिविभो ब्रह्मकुलोद्भव ॥ कृतदस्युमयक्षितिपपराभव ॥११॥
जय सर्वोत्तम रामरघूत्तम ॥ पंतविठ्ठलप्राणप्रियतम ॥ १२ ॥

## पद ८.

परमधाम जलदश्याम रामसखा गायरे ॥ ध्रु० ॥ ध्यान भजन यजन करुनि ॥ भगवज्जनसंग धरुनि ॥ वरुनि शांति विगलित मनिं ॥ विष्णुपदीं त्वरित जायरे सखे ॥ पर० ॥ १ ॥ निर्गुणपदिं नित्य सक्त ॥ शुकसनकप्रभृति मुक्त ॥ निरतिशय प्रेमयुक्त ॥ भजति वंदीयपायरे ॥ पर० ॥ २ ॥ अज गज हय महिषि गाय ॥ तनय स्त्री विविध दाय ॥ केवलही जळत खाय ॥ पडुनि यांत करिसि हायरे ॥ पर० ॥ ३ ॥ कवि विठ्ठलराय ह्मणे ॥ निर्मद निर्मायपणें ॥ सम्मतअनपाय हाचि ॥ भवतरणा शुभ उपायरे ॥ परमधाम० ॥ ४ ॥

## पद ९.

कां फिरसी तूं रिकामा ॥ शरण रिघें श्रीरामा रामा ॥ कां०

दैवाधीन तों अन्नाच्छादन ॥ त्याचा काय हमामा ॥ कां० ॥ १ ॥
पुत्रकलत्र मित्र कुणाचे ॥ कोण कुणाचा मामा ॥ कां० ॥ २ ॥
दीनपणें मदमत्तजनाचा ॥ कां करितोसि खुषामा ॥ कां ॥ ३ ॥
भक्तजनासि नुपेक्षी प्रभु हा ॥ वाजे वेद दमामा ॥ कां० ॥ ४ ॥
विठ्ठलपंत प्रभु करुणाकर ॥ नेइल निजसुखधामा ॥ कां० ॥ ५ ॥

## पद १०.

स्मर सखया हरिच्या पाया ॥ किति उगाच फिरासिल वांया ॥ ध्रु० ॥ दैवि दुरत्यय गुणमयमाया ॥ नान्य उपाय तराया ॥ १ ॥ यत्न जपा या करिसि उपाया ॥ किति चिंतिसि सुत जाया ॥२॥ काळ सदोदित ही तव काया ॥ टपला गट्ट कराया ॥ ३ ॥ हाचि सुगम पंथ भव उतराया ॥ गमला विठ्ठलराया ॥ ४ ॥

## पद ११.

आयकें भीष्मकतनये, मद्विवाह कथितें विनये ॥ ध्रु० ॥ मज्जनकें अवमानियला, लघु काम द्रोण निंदीला ॥ तद्विरोध द्रोणें धरिला, मत्तातगर्वही हरिला ॥ पांचालहि जंव मनिं खचला, तंव उपाय द्रुपदा सुचला ॥ चाल ॥ द्रोणघ्न पुत्र निर्माया ॥ कौंतेयस्नेह साधाया ॥ श्रीकृष्णप्रसादहि व्हाया ॥ उपयाज दर्शना वर्नि ये ॥ आयकें० ॥ १ ॥ याजोपयाज संमतिनें, सव मांडिलाचि नरपतिनें ॥ हवनांतीं राज्ञिस मुनिनें, घे भाग ह्मणे परि सतिनें ॥ नेत्रे तिस रोधिलि पतिनें, दे अग्निमुखीं मुनि विधिनें ॥ चाल० ॥ होमितांचि कुंडीं पाहे, शरधनुभृत बालक राहे ॥ मजलाही पाहुनि देहें॥ कंवटाळुनि धरिलें रायें ॥ आ० ॥ २ ॥ द्रुपदीं फलभारचि पिक-

ला, आनंद जाहला सकळां ॥ जाणुनि मत्परिणयकाला, नृपमनीं हेतु उदेला ॥ जतुमदनदाह जंव कळला, दुःखाग्निमाजिं तळमळला ॥ चाल ॥ ही कन्या कोणा द्यावी ॥ सुविचार सुचेना भावी ॥ मत्कीर्ति जगीं कसि व्हावी ॥ चिंतार्त जाहला सखये ॥ आयकें० ॥ ३ ॥ सैंवरासि आरंभीलें, नृपवरां लिखित प्रेषीलें ॥ संपत्तिसहित नृप सजले, घंटापथ दानें भिजले, पांचालनगर गजबजलें, परि भामिनि मन्मन थिजलें ॥ चाल ॥ पांडवां पथिकमखि कळलें ॥ स्वाचरणीं परि नच मळले ॥ चातकीस घनसे वळले ॥ पांचालपुरीप्रति मदये ॥ आ० ॥ ४ ॥ सये रंगमंडपीं राजे, पातले भयद वीरा जे ॥ संपूजुनि ते यूवराजे, अभिवासनिं द्रुपदहि गाजे ॥ वृकधूपें भावितमदजे, मलयानिल पाहुनि लाजे ॥ चाल ॥ ऋषिमंत्राहि पूजित शोभे ॥ जे महार्थ आल लोभें ॥ मग न्हाणुनि मज वैदर्भें ॥ मज्जननीसुख नच माये ॥ आ० ॥ ५ ॥ अलिजनें घातली वेणी, धम्मिल्ल ग्रथितनगश्रेणी ॥ तानवडें बाळ्या कर्णीं, नग त्यागिलेचि सौवर्णीं ॥ मुक्तावलि कंठाभरणी, मृदुसिंजित मंजिर चरणीं ॥ चाल ॥ पुढें काय सांगु सखे तुजला ॥ नेसवितां शालू मजला ॥ तो वेष असा कीं सजला ॥ मोहिनीरूप जनमनिं ये ॥ आयकें भीष्मकत० ॥ ६ ॥

## पद १२.

रामदूत हनुमान् विजयते ॥ ध्रु० ॥ यो रघुपतिनाऽऽह सुग्रीवं ॥ मैत्र्या योजितवान् ॥ १ ॥ तीर्त्वा दुस्तरसिंधुं सीता शुद्धिं यः कृतवान् ॥ २ ॥ भित्वाऽरण्यं हत्वा योऽक्षं ॥ लंकां ज्वालितवान्

॥ ३ ॥ पुनरेत्य श्रीरामं विठ्ठलमपि यो हर्षितवान् ॥ विजयते रामदूत० ॥ ४ ॥

## पद १३.

• चिदानंदकंद मंदहासनंदना ॥ ध्रु० ॥ सुंदर वदनारविंदइंदिरेंद्र कुंदरदन ॥ वृंदारकवृंदवंद्य दुष्टकंदना ॥ १ ॥ गोवर्धनधारका गो गोपी गोपिका गजगोपकगरुडनाथ तृप्तिचंदना ॥ २ ॥ जयजय गोपालकृष्ण दामोदर वासुदेव ॥ नारायण विठ्ठलाख्य विहितचंदना ॥ चिदानं० ॥ ३ ॥

## पद १४.

दुग्धाब्धिशायिन् शरणागत सुखदायिन् भगवन्नमस्ते ॥ ध्रु० ॥ दुग्धफेनधवलयशा ॥ दुग्धदिग्धसितहासा ॥ दुग्धप्रद उपमन्योर्मेंदुग्धस्नायिन् ॥ दुग्धा० ॥ १ ॥ दुग्धचौर्यलंपटा ॥ दुग्धदिग्धअधरपुटा ॥ दुग्धमधुर नामधेय दुग्धप्रदायिन् ॥ दुग्धा० ॥ २ ॥ दुग्धांबुधितनयावर दुग्धांबुधिमथनचतुर ॥ पंत विठ्ठलाख्यकवेर्दुग्धप्रदायिन् दुग्धा० ॥ ३ ॥

## पद १५.

नमोनमस्ते दधिवामन भो ॥ ध्रु० ॥ पूर्णदयोदधि दधिभक्तप्रिय दधिघटहरुनिजाय ॥ १ ॥ दधि मथितां जननिसुत प्रेमें ॥ नवनीत चोरुनि खाय ॥ २ ॥ दधिघट भंगुनि ह्मणे भुलला ॥ दधि खा आणि दधिसाय ॥ ३ ॥ दधिघृतनवनीतप्रिय यशाहि ॥ प्रेमें विठल गाय नमोनमस्ते० ॥ ४ ॥

## पद १६.

मधुरिपु मधुविपिनीं मधुकालीं ॥ ध्रु० ॥ सखि मधु मधुरतर मंजुल ॥ वाजवितो मुरली ॥ १ ॥ मधुकरनिकरें मधुररवेंमधु माधव कां त्यजिली ॥ २ ॥ मधुनि मधुनि विधु सदृशमुख वधूतानलयें मुरली ॥ ३ ॥ विठ्ठलपदिं स्वर्धुनिशी अधुना चित्तवृत्ति जडली ॥ मधु० ॥ ४ ॥

## पद १७.

हरिची नाम शर्करा गोड ॥ सोडवि दुर्मति खोड ॥ ध्रु० ॥ दुष्ट धृष्ट परिपुष्ट अहंकृति,–महिष होतसे रोड ॥ हरि० ॥ १ ॥ हरउनि संशय सकल मनाचे ॥ उपजवि सन्मति-मोड ॥ हरि० ॥ २ ॥ सुलभ सेवितां सहज होतसे ॥ ब्रह्मपदाची जोड ॥ ह० ॥ ३ ॥ पंतविठ्ठल-प्रेक्षित ही भलि ॥ भवतरणा तरि जोड ॥ हरिची नाम० ॥ ४ ॥

## पद १८.

भज रघुवीरं समरसुधीरं ॥ समरसुधीरं ॥ ध्रु० ॥ सद्गुणसदनं हिमकर वदनं ॥ कांचनमयकोटीरं ॥ १ ॥ करधृतचापं परिहृततापं ॥ नवघन रुचिरशरीरं ॥ २ ॥ दशरथतनयं प्रकटित विनयं ॥ विठ्ठलपालनधीरं ॥ ३ ॥

## पद १९.

रामराजाधिराज ॥ भज सांडोनी लाज ॥ ध्रु० ॥ करधृत शरधनु ॥ संचरितो भक्ता अनु ॥ नवघन श्यामतनू ॥ साधितोस दासकार ॥ रामराजा० ॥ १ ॥ दीननाथ दीनबंधु ॥ तोडिं भक्तभव-

बंधु ॥ विठ्ठलासि कृपासिंधु ॥ जो चालवितो विचार ॥ रामराजाधिराज० ॥ २ ॥

## पद २०.

अरे मानवा भज राघवा किति वैभवा भुलसी नवा ॥ ध्रु० ॥ त्यजुनी मदा भजतां पदा हरि आपदा नहि वानवा ॥ अ० ॥ १ ॥ बहु पाहिलें रस गाइले जरि सेविले तरि हा नवा ॥ अरे० ॥ २ ॥ प्रभुविठ्ठला शरण चला कुरु मारिला भवदानवा ॥ अरे० ॥ ३ ॥

## पद २१.

त्यजुनि कामधाम सदा गाई श्यामधाम राम ॥ ध्रु० ॥ घाम येतसे निकाम काम करुनि अष्टजाम ॥ किति करिसि दाम दाम दाम॥१॥ आत्मग्रामचा मुकाम काम करुनि हो विराम ॥ भोगि रामनाम हा इनाम ॥ २ ॥ संतगीत कथानंत राम श्रीमंत ॥ कृपावंत पंत विठ्ठलाभिराम ॥ ३ ॥

## पद २२.

भज भज मनुजा श्रीगोपालं ॥ ध्रु० ॥ मृगमदचंदन चर्चितभालं ॥ धूसरिताल्कजालं ॥ १ ॥ कुंडलमंडितचारुकपोलं ॥ कर्षित राधाचोलं ॥ २ ॥ दुर्धरदुर्मदकालियकालं ॥ विठ्ठलपालनशीलं ॥ भज० ॥ ३ ॥

## पद २३.

भज भज मनुजा श्रीरघुवीरं ॥ ध्रु० ॥ रावणराक्षस नाशगभीरं ॥ रविवंशांकुरहीरं ॥ १ ॥ मुनिजनमानसपंजरकीरं ॥ नीरदसुभगशरीरं ॥ २ ॥ पंचवटीतटविहितकुटीरं ॥ विठ्ठलमीनसुनीरं ॥ ३ ॥

## पद २४.

स्मर मानव हरिच्या पाया ॥ किति उगाचि शिणसिल वायां ॥ ध्रु० ॥ गुणमय दुर्धर व्यापुनि भरली ॥ दुस्तर श्रीहरिमायारे ॥ १ ॥ यत्न जपाया करिसि रुपाया ॥ चिंतिसि किति सुतजायारे ॥ २ ॥ स्वपदीं जाया दुःख हराया ॥ विठ्ठल विभुगुण गायारे ॥ स्मर मानव० ॥ ३ ॥

## पद २५.

रतरे रत सखया राघवनामीं ॥ किति रमसिल कामीं ॥ रामनाम सुखधाम निरंतर सेवुनियां त्यज कुमति रिकामी ॥ रत० ॥ ध्रु० ॥ नाना जन्मार्जित दुरितें जळलीं ॥ कृतपुण्यें फळलीं ॥ तैं या नरतनुची प्राप्ती कळली ॥ मग मति कां चळली ॥ लाज लाज करि काज स्मरसि रघुराजपद विरम धनसुतधामीं ॥ रत० ॥ १ ॥ दारादी विषयाचा भ्रम किति वारा ॥ समजुनि मनिं थारा ॥ सारा मायिक कीं मोहपसारा ॥ सारा निस्सारा ॥ इष्टमित्र कुल गोत्र वृथा सर्वत्र भ्रमरे काकी मामी ॥ रत० ॥ २ ॥ करणें सत्संगें गतमद करणें ॥ शुद्धांतःकरणें ॥ स्मरणें हितवरणें संसृति तरणें ॥ सत्कर्माचरणें ॥ समज उमज हित समज उमज मनिं देशिकवचनें कवण कसा मी ॥ रत० ॥ ३ ॥ ऐशा साधनें बहुजन तरले ॥ शांतीनें वरिले ॥ सहज देहत्वापासुनि सरले ॥ निजपदिं अनुसरले ॥ भजन करिसि तरि तरसि सहापितर येविषयीं तुज विठ्ठल हामी ॥ रतरे तर० ॥ ४ ॥

## पद २६.

पंडित होउनि धुंडितसां हे ॥ खंडित किति आह्मि पावरतीसे ॥ध्रु०॥ मुंडित किति किति तुंडि तरुछद॥दंडि तपस्वि गुहांतरिं बैसे॥ थंडि तथोष्ण सहोनि अखंडित पंडित देह किती वनिं ऐसे ॥ झुंडि तशाहि उलंडितसे स्मर खिंडित गांठुनि तस्कर जैसे ॥ १ ॥ मंडित रघुकुल खंडित निजधनु शुंडित कीर्तिवितान जयाचें ॥ पंडित कीश उलंडित सागर दंडित रावण त्याहि विभूचे ॥ जोहि अखंडित मानसकुंडित नामरसामृत सांठवि ज्याचें ॥ चंडितनू दळिं हिंडतसे शिव लंडि तयापुढें काम न वांचे ॥ २ ॥ बायक आयक काय कथूं तुज सायकपाणि शरासनधारी ॥ सत्सुखदायक श्रीरघुगायक हो आणि पाय करीं धरिं ॥ लायक हाचि उपाय कविस्मृत अन्य अपायकर स्मृतिहारी ॥ तो रतिनायक काय करी मग राय कवीश्वर विठ्ठल तारी ॥ ३ ॥

## पद २७.

कां माझ्या बाळावरि निष्ठुर इतुकीगे कैकेयीबाई ॥ धाडुं नको रघुराज वनाप्रति लागतों तुमचे पायीं ॥ ध्रु० ॥ सर्वस्वीं अपराधि तुझे आह्मि घालुनि पोटीं साहीं ॥ या संभारें राज्य समस्तहि भरताप्रति तूं देई ॥ १ ॥ या रामाचे नवनीताहुनि कोमलतर पदपायीं ॥ दंडक कानन कंटक दुर्गम जाय कसा त्या गे पायीं ॥२॥ पाहि विभो मां विठ्ठल केलें दुष्कृत तारि असे कांहीं ॥ यापरि विनवीतसे परि अंतरिं लेश दयेचा गे नाहीं ॥ कां माझ्या बाळावरि निष्ठुर० ॥ ३ ॥

## पद २८.

भज मनुजा रामचंद्रा ॥ भज मनुजा रामचंद्रा ॥ भज० ॥ ध्रु०॥ सुख मानुनी संसारीं, सुख शय्येमाजिं नारी, विषयाची प्रीति भारी, किति करिसी गाढनिद्रा ॥ भज० ॥ १ ॥ क्षणभंगुर संपत्ति, घडे अंतीं ते विपत्ति, किति हत्ती घोडे पत्ती, क्षय आहे इंद्रचंद्रा ॥ भज० ॥ २ ॥ कविपंत विठ्ठल नाम, गुणग्राम पूर्णकाम, भजतो कीं सौख्यधाम टाकुनियां सर्व तंद्रा ॥ भज० ॥ ३ ॥

## पद २९.

स्मर मानव हरिच्या पायां ॥ किति उगाचि शिणशिल वायां ॥ ध्रु० ॥ गुणमय दुर्धर व्यापुनि भरली ॥ दुस्तर श्रीहरिमाया ॥ १ ॥ सुगम उपाया सांडुनि वायां ॥ चिंतिसि किति सुतजाया ॥ २ ॥ यत्न जपाया करिसि रुपाया ॥ कां भरिसि धनजाया ॥ स्मर मानव० ॥ ३ ॥

## पद ३०.

भो दाशरथे रामा ॥ ध्रु० ॥ सुरवरमुकुट किरणचयरंजितचरण-सरोज ॥ पातकमोचन पंकजलोचन सकलजलदघनश्याम ॥ १ ॥ दशशतकरकुल तिलक गुडालक दशमुखहननपटो ॥ दशरथनंदन खलबलकंदन निखिलसुगुणगणधाम ॥ २ ॥ निजचरणप्रणतमज्जनर-क्षण दक्षिणमुकुटमणे ॥ भवधनुभंजन भवभयखंडन विठ्ठलकविवि-श्राम ॥ ३ ॥

## पद ३१.

उत्तमजन्मा येऊनि रामा गेलों मी वायां ॥ तव पदसेवा किम-

पि न घडली जन्ममरण चुकवाया ॥ ध्रु० ॥ आधीं चुकलों मुकलों मी निज वेद स्वाध्याया ॥ कर्में श्रौत स्मार्त न घडलीं सद्गति साधाया ॥ पुराण परिसुनी सादर झालों यशाही न तव गाया ॥ स्वस्थपणें कधीं नाहीं फावलें तुजला पूजाया ॥ १ ॥ आर्जविलें बहु लवणभंजनें व्याह्यां जावायां ॥ क्षुधित अतिथी कधीं नाहीं घेतला प्रेमें जेवाया ॥ उदार कर कधीं केला नाहीं पैसा एक द्यावा ॥ नाम फुकटचें तेंही न आलें स्वामी वदना या ॥ २ ॥ कपट करुनियां निपट भोंदिल्या बहुत आयाबाया ॥ केली धनगृह क्षेत्र स्त्री पशु शिशुवरी बहु माया ॥ नित्य सजविली वसनें भूषणें निंद्या ही काया ॥ सज्ज ठेविली सदा ही रसना सज्जन निंदाया॥३॥ वटवट निशिदिनीं केली चहुंकडे मन हें रमवाया ॥ केलें स्नान न संध्या जपतप दुष्कृत शमवाया ॥ क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ॥ सद्यः कामुक झालों पाहुनि परधन परजाया॥४॥ नाही विद्या कलाकुशलता तुजला रिझवाया ॥ शुद्ध मधुर वाणीही नाहीं प्रभु तुजविन वाया ॥ बुद्धिही नाहीं न कळे कांहीं शरणागत व्हाया ॥ थकली मजल सर्वथा दयाळा स्वहिता आचराया॥५॥ हरी कनवाळू करि दीनावरी करुणेची छाया ॥ निगम नगारा गर्जे ऐसा निखिला कळवाया ॥ त्यावरी विश्वासुनिया आलों जवळीं तुझ्या पायां ॥ शुद्ध दगड हा पंत विठ्ठल स्वामी रघुराया ॥ उत्तम जन्मा० ॥ ६ ॥

# रामदास स्वामी.

## पद १.

कृपाळूरघुवीरेंखादलींभिलटिचोरें ॥ उच्छिष्टआदरेंअंगीकारिरे ॥ ध्रु० ॥ वैभवींनाहींचाडदेवातेंभावचिगोड ॥ पुरवितोकोडअनन्याचेंरे ॥ १ ॥ दुर्लभब्रह्मादिकांसीसुलभवानरांसी ॥ कायतयापाशींभावेंविणेरे ॥ २ ॥ रामींरामदासह्मणेदेवहादयाळूपणें ॥ उठवितोरणेंवानराचींरे ॥ ३ ॥

## पद २.

जन्मलाचिनाहींतोमरेलकाई ॥ जीर्णेमरणेंदोन्हीनाहींरे ॥ ध्रु० ॥ जनींजीवनमुक्तवर्ततातहरीभक्त ॥ सद्गुरुबोधेंतेअच्युतरे ॥ १ ॥ जिणेंआणिमरणेंयेणेंआणिजाणें ॥ साधुतोअचळपूर्णपणेंरे ॥ २ ॥ सेवितांसाधूचेचरणबाधिनादक्षणायन ॥ रामींरामदासींनिजखुणरे ॥३॥

## पद ३.

भूषणमंडितमाळातेजाचाउमाळा ॥ सुंदरसुमनमाळा ॥ भोंवतामधुकरपाळा ॥ १ ॥ रघुवीरसुरवरदानीभक्तांचाअभिमानी ॥ योगी मुनिजनध्यानींराहातीसमाधानीं ॥ ध्रु० ॥ पीतवसनघनसाजे ॥ मुरडीववाकीवाजे ॥ वरतोडरीब्रीदगाजे ॥ कीर्तिविशाळचिमाजे ॥ २ ॥ अभिनवकार्मुकपाणी ॥ निगमगातीपुराणीं ॥ विगळितहोतेवाणी ॥ समजतसेशूळपाणी ॥ ३ ॥ रामसकळजनपाळी ॥ भक्तालासांभाळीं ॥ जन्ममरणदुःखटाळी ॥ अगणितसौख्यनव्हाळी ॥ ४ ॥ दासह्मणेमजहित ॥ माझेंकुळदैवत ॥ जेजनहोतीरत ॥ तेसकळहीतरत ॥५॥

## पद ४.

समर्थाचागाभाभीमभयानकउभा ॥ पाहतांसुंदरशोभालाचावेमन लोभा ॥ध्रु०॥ हंकारेभुभुकारेकाळह्मणेअरेबारे ॥ विघ्नतगेनाथारेधन्य हनुमंतारे ॥ १ ॥ दासह्मणेवीरगाढा ॥ घर्षितवनसरदाढा ॥ अभिनव हाचिपवाडा ॥ पाहतांवरदिसेजोडा ॥ २ ॥

## पद ५.

रावणसीतादडवीभीमनिशाचरबडवी ॥ अघटिततेघडवीवग्रजनीचरतेगडवी ॥ ध्रु० ॥ जाउनिसीताशोधी ॥ सकळांचाविरोधी ॥ वानरमोठाक्रोधी ॥ त्रिकुटींजनरोधी ॥ १ ॥ मोठीआलीधाडी ॥ पुच्छानेंपछाडी ॥ होतीताडातोडी ॥ कंठींझोडाझोडी ॥ २ ॥ दैत्यीं केलेचाळे ॥ सुरवरबंदीशाळे ॥ त्यारागेंउफाळे ॥ वन्हीचेउबाळे॥३॥ बनींबनेंकडकावी ॥ बळकटशिक्षालावी ॥ भुजाबळेंभडकावी ॥ लंकेतेंधडकावी ॥ ४ ॥ सीताशोधूनगेला ॥ हलकालोळकेला ॥ भेटेराघवाला ॥ दास्यत्वेंनिवाला ॥ ५ ॥

## पद ६.

वेधुलागलारामाचा ॥ सुरवरविश्रामाचा ॥ ध्रु० ॥ तेथेंसुरवरनरकीन्नरविद्याधरगंधर्वांचामेळा ॥ तेथेंध्वनिकोकिळामंजुळकिळा ॥ झुळकीरम्यरसाळा ॥ तेथेंगायनकळारंगआगळा ॥ बाहेअमृतवेळा ॥ तोसुखसोहळादेखूनडोळा ॥ लाचावेमनमेळा ॥ १ ॥ एकतालमृदंगेंश्रुतिउपांगें ॥ गातीनवरसरंगें ॥ एकरंगसुरंगेंदावितीसंगेंसप्तस्वरांचीं अंगें ॥ एकअनेक ॥ रागेंआलापयोगें ॥ विकटतालसुधांगें ॥ एक झकिटकिटकिटथरिकथरिकवाजतीचपळांगें॥२॥तेथेंखणखणखणखणटा-

ळवाजती ॥ झणझणझणझणयंत्रें ॥ तेथेंदणदणदणदणमृदंगमंजुळ ॥ तालबद्धपरतंत्रें ॥ तेथेंचणचणचणचणशब्दबोलती ॥ वाणीचपळ सत्पात्रें ॥ तेथेंघणघणघणघणघंटावाजती ॥ अनुदातेशुळमंत्रें ॥ ३ ॥ तेथेंझगझगझगझगझळकतीरत्नें ॥ स्वचितबैसेशोभा ॥ तेथेंधगधगधगधगतेजआगळेंलावण्याचागाभा ॥ तेथेंमगमगमगमगसुगंधपरिमळ ॥ सत्यदयेतिलोभा ॥ पवनतनुजदासाचेंमंडन ॥ निकटराहिलाउभा ॥४॥

## पद ७.

रामाचालरेंझडकरी ॥ त्रिभुवनहरुषेभारी ॥ ध्रु० ॥ शरयुनदीतिरींअयोध्यापुरीरमणियराचिलीभारी ॥ तीसीप्रतिमल्लसरीऐसीचदुसरी नाहींपृथ्वीवरी ॥ तेवैकुंठमंदिरींगमनसुंदरीसत्यामधेंथोरी ॥ ऐसेजाणोनीश्रीकौसल्योदरीं ॥ आनंदसचराचरीं ॥ १ ॥ तेथेंऋषिकुळसकळनांदतिनिर्मळ ॥ उछाहाचेनिउसळें ॥ तेथेंधोत्रेंसोज्वळेंझलिती करतळेंविभूतिचेगोळे ॥ तेध्यानींनाकळेमनानाढळेतेंरूपपाहातीडोळे ॥ आणिक्रूरविशाळेंवधिलीढिमाळें ॥ पावोनियत्नेंफळें ॥ २ ॥ तेथें ब्रह्मनंदिनीश्रापबंधिनीअसतांनिजपतिवचनीं ॥ तेरामागमनींऐकतक्षणींहरुषतअंत:करणीं ॥ ह्मणेत्याश्रीचरणींहोताभिळणीपालटेनपापाणीं ॥ ऐसेंचिंतुनिदिवसरजनीपथापाहतांलोचनीं ॥ ३ ॥ तेथेंसुरवर नाचतिवाद्यें वाजतीवरुषतिपुष्पेंजिमुनीं ॥ तेथेंगंधवातगतीनेंतादिगांतींघ्राणाहोतसेतृप्ती ॥ तेथेंदिशाझळकतीसफळवनस्पतीपदशुभबोलती ॥ आलाह्मणतीरामसीतापती ॥ जयजयकारेंगर्जती ॥ ४ ॥ तेथेंदशरथमानसींरामश्रवणशशीतुंबळसुखसिंधुसी ॥ तेथेंजनकसरीतेसिंमिळणी कैसीहोताहेगजरेंसी ॥ तेथेंभक्तचकोरासीआनंदअहर्निशींपाहताती-

उदयासी ॥ ऐसें देखुनि भक्तीनवमीसी प्रगटतरामदासीं ॥ ५ ॥

## पद ८.

फरफरफरफरखोढितीकुंजरधनुष्यआणिलेंभूपें ॥ हरहरहरहरअतिपणदुष्करसुंदररघुपतीरूपें ॥ वरवरवरवररघुपतीवोढीतदशमुखसंतापे ॥ करकरकरकरकरशकरारेथरथरथरभूकंप ॥ ध्रु० ॥ रामेंसज्जिलेंवितंडपरमचंडकोदंड ॥ रामेंउचलिलेत्रिंबककौशिकऋषिपुलकांक ॥ रामेंओढिलेंशिवधनुसीतचेंतनुमनु ॥ रामेंभंगिलेंभवचापअसुरासुटला कंप ॥ १ ॥ कडकडकडकडभग्नकडाडे ॥ तडतडतडकफुटे ॥ गडगडगडगडगगनकडाडी ॥ धडधडधडधडकउठे ॥ भडभडभडभडरवीरथचुकेंघडघडीतआव्हाटे ॥ खडखडखडखचितदिग्गजचळीतकुळाचळकुटे ॥ २ ॥ दुमदुमदुमदुमदुमितभूगोळेस्वर्गमृत्युपाताळें ॥ धुमधुमधुमधुमधुमकटकर्णीविधीसबैसलेंटाळे ॥ हळहळहळहळअतिकोल्हाळहळ ॥ हरसीपंचकडोळे ॥ खळखळखळखळउचंबळतजळसिंधूसीमोहोआंदोळे ॥ ३ ॥ धकधकधकधकधकीतधरणीधरबधिरझाले नयन ॥ चकचकचकचकचकीतनिशाचरकरविलेंदीर्घशयन ॥ थकथकथकथकथकीतसुरवरवरुपतीपुष्पेंतसे ॥ लखलखलखलखलखरत्नमालिकाजनकबालिकलग्न ॥ ४ ॥ जयजयजयजयजयतिरघुराजविराजयकारेंगर्जती ॥ धिमधिमधिमधिमनृपदेवदुंदुभिगगनगर्जलेंगजरें ॥ तरतरतरतरमंगळतुरेंविविधवाद्येंसुंदरें ॥ समरसरसरसदासामानसींरामसीतावधूवरें ॥ ५ ॥

## पद ९.

रंगींनाचतोत्रिपुरारीलीलानाटकधारी ॥ ध्रु० ॥ मंदरजावरत्रिपुर-

सुंदरअर्धनारीनटेश्वर ॥ नाचेशंकरसकळकळाकर ॥ विश्वासीआधा-
र ॥ छ ॥ झुळझुळझुळझुळशिरींगंगाजळझळझळमुगुटींकिळा ॥ ळळ-
ळळळळळळळितकुंडलेंभाळींइंदुज्वाळ ॥ सळसळसळसळसळकतीर-
सनावळवळवळीतीव्याळ ॥ हळहळहळहळकंठींहळाहळ ॥ गायन-
स्वरमंजुळ ॥ १ ॥ थबथबथबथबगळतीसद्यारुंडमाळिकाकंठीं ॥
चपचपचपचपहस्तकलवतिदस्तकधरीधूर्जटी ॥ खडखडखडखडखड-
व्याघ्रांबरगजचर्मपरवंटी ॥ भडभडभडभडभडधूसरउधळतचिताभ-
स्मनिजउटी ॥ २ ॥ किणिकिणिकिणिकिणिवाजातिकिंकिणिघणघण-
घणखणाणी ॥ झणझणझणझणवाकीचरणीं ॥ दणदणदणधरणी ॥
खणखणखणखणटाळउमाळेरुणझुणवेत्रेंपाणी ॥ गुणगुणगुणगुणवर्णि-
तीवाणी ॥ खुणखुणखुणनिर्वाणीं ॥ ३ ॥ टिमिटिमिटिमिटिमिमृदंगगं-
भिरडिमिडिमिडिमिडिमर ॥ धिमिधिमिधिमिधिमिदुंदुभिगर्जेझिमिझि-
मिझिमिझल्लर ॥ घुमघुमघुमघुमयेवजगमकतडुमडुमआंबर ॥ ततथैततथै
धिकिटधिकिटह्मणतीविद्याधर ॥४॥ थरथरथरथरकंपितगमकेगरगरगर-
गरभ्रमर ॥ सरसरसरसरकंपितचमकेधुरधुरधुरधुरगंभीर ॥ परपरपर-
परह्मणतीसुरवरहरहरहरहरशंकर ॥ वरवरवरवरदासादिधला ॥ तर-
तरतरतरदस्तुर ॥ ५ ॥

## पद १०.

आठवेमनींआठवेमनींआठवेमनींसदारामचिंतनीं ॥ ध्रु० ॥ मुगु-
टींकरीटीवक्रभृकटिरम्यगोमटींनयनांबुजें ॥ १ ॥ मकरकुंडलेंठाणदं-
डलेंतेजखंडलेंमेघदामिनी ॥ २ ॥ बाणलीउटीकासगोमटीकिंकिणीक-
टींक्षुद्रघंटिका ॥ ३ ॥ पदकमेखळाफाकतीकिळा ॥ रुळतीगळांमुक्त-

माळिका ॥ ४ ॥ तींसुलक्षणेंरत्नभूषणें ॥ वीरकंकणेंशोभतीकरीं ॥ ॥ ५ ॥ रम्यरंगलेंचापचांगलें ॥ सैन्यभंगलेंत्रिकुटाचळीं ॥ ६ ॥ आंदुनेपुरेंवाकीगजरे ॥ तींमनोहरेंपाउलेवरीं ॥ ७ ॥ हृदयकमळीं मूर्तीसांवळी ॥ दासन्याहळीकुळदैवत ॥ ८ ॥

## पद ११.

नवमिकरानवमिकरानवमिकराभक्तिनवमीकरा ॥ ध्रु० ॥ अष्टमीपरीनवमीबरी ॥ तयेदुसरीनपवेसरी ॥ १ ॥ रामप्रगटेभेदहातुटे ॥ अभेदउमटे तेचिनवमी ॥ २ ॥ शीघ्रनवमीयेतेसेउर्मी ॥ रामदास मींआर्पिलीरामीं ॥ ३ ॥

## पद १२.

दीनबंधुरेदीनबंधुरेरामदयासिंधुरे ॥ ध्रु० ॥ भिलटीफळेंभक्तवत्सलें ॥ सर्वसेविलीदासप्रेमळें ॥ १ ॥ चरणींउद्धरीदिव्यसुंदरी ॥ शापबंधनेंमुक्तजोकरी ॥ २ ॥ वेदगर्भजोशिवचिंतितो ॥ वानरारिसागूजसांगतो ॥ ३ ॥ राघवीबिजेरावणानुजे ॥ करुनिपावलानिजराज्यजें ॥ ४ ॥ पंकजाननेंदैत्यभंजनें ॥ दासपाळिलेविश्वमोहनें ॥ ५ ॥

## पद १३.

मांबुजाननंमांबुजाननंमांबुदेहिमे ॥ योगिरंजनंचापभंजनं ॥ जनकजापतिविश्वमोहनं ॥ १ ॥ विबुद्धकारणंशोकहारणं ॥ अरिकुळांतकभयनिवारणं ॥ २ ॥ जयकृपालयंदासपालयं ॥ चरणपंकजंदेहि मेलयं ॥ ३ ॥

## पद १४.

ऐसेंध्यानसमाननदिसेरामानिरुपमलीळा ॥ सांवळेंसुंदररूपमनो-

हरशोभतीसुमनमाळा ॥ ध्रु० ॥ मुगुटकिरीटींकुंडलेंमंडितगंडस्थळाव-रिशोभा ॥ केयूरदंडउदंडविभूषणलावण्याचागाभा ॥ १ ॥ सरळकु-रळनयनकमळदळशामसकोमळसाजे ॥ झळकेइंद्रनीळतळपेरत्नकिळ-मुनिजनध्यानींविराजे॥२॥ भाळविशाळरसाळविलेपनपरिमळअनिळवि-लासी ॥ मृगमदकेशरधूसरआंगींहासितवदनसुखरासी ॥ ३ ॥ कटतटवेंकटकासेपीतपटमिरवतउटीमुगंधें ॥ रुळतकलोळमुढाळमाळि-काडोलतीतेणेंछंदें ॥ ४ ॥ जडितपदकवीरकंकणकिंकिणीआंदुनेपुर-वाजे ॥ सकळरिपुकुळनिर्दळणेंसेंवाकीतोडरब्रीदगाजे ॥ ५ ॥ कर-शरचापविलापदानवाकाळरूपमतिभासे ॥ दासह्मणेरणकर्कशरामें-अंतकनोहीत्रासे ॥ ६ ॥

## पद १९.

मिरासीचाठावमिरासीचाठावमिरासीचाठावमिरासीचाठावधरारे ॥ जेथुनिआलेतिथेंचिजाउनिमागुतीवासकरारे ॥ ध्रु० ॥ अज्ञानदा-रिद्रनिरसलें ॥ ज्ञानलक्ष्मीतेंकोणपुसे आपणचिसर्वहीअहंकारगोत्र ॥ आवातत्रोपातेथेंनेत ॥ येकपदतेथेंविपटनाहींसर्वहीसिद्धीविलसे ॥ एसी हेमिरासीटाकियेलीथोरमस्तकींअभीमानापिसें ॥ १ ॥ संतसनकादी-कनारदतुंबरवृत्तीतेहीलक्षिली ॥ नागिवेउघडेआपदाभोगुनिजीवेसी-सदृढधरिली ॥ वडिलांचीजन्ममृत्यूभूमीतेहीसर्वकाळयत्नकेली ॥ धि-गीधिगीतेजिणेंपूर्वजाचीवृत्तीअसोनिहातींचीगेली ॥ २ ॥ येकलाएक-लमीरामदासवृत्तीलागीहोयपिसा ॥ तनुमनुधनुसर्वहीअर्पुनिसोडिली जीवित्वआशा ॥ निःकामताकोणीपाठीसीनाडलेयेकचिथोरकोंवसा ॥ हेवृत्तीरक्षीलमाझाराम त्याचामजभरंवसा ॥ ३ ॥

## पद १६.

आलियाअंगेंचिहोयिजेदेव ॥ कोंदाटलाब्रह्मकटाह ॥ ध्रु० ॥ भवसिंधूचेंजळआटलें ॥ संसाराचेंमूळतुटलें ॥ १ ॥ निजधनाचीलाधली ठेवी ॥ रंकपावलेराज्यपदवी ॥ २॥ अरेकाळाचीवेळचुकली ॥ आनंदाचीलुटीफावली ॥ ३ ॥ जेमायेनेंजन्मदाविला ॥ तेमायेचाठावपूसिला ॥ ४ ॥ रामदासासिरामभेटला ॥ थोरसंदेहहातूटला ॥ ५ ॥

## पद १७.

वेडियास्वामीचहोऊनिराहे ॥ हेउपाधीतुजनसाहे ॥ ध्रु० ॥ आरेतुझाचितूंसकळ ॥ तरीवायांचिकातळमळ ॥ १ ॥ स्वामीसेवकपणहेंवाव ॥ अभिमानासीकैचाठाव ॥ २ ॥ अमंगळेंजाणमीतारें ॥ कायभूषणसांगसीत्याचेंरे ॥ ३ ॥ मीपणाचेंमूळतुटावें ॥ आनंदाचेंसुखलुटावें ॥ ४ ॥ रामदासचिनांवहेंफोल ॥ तथेंकायसेलागतीबोलरे ॥ ५ ॥

## पद १८.

देवाचीकरणीऐसीही ॥ ध्रु० ॥ पहादशगुणेंआवरणोदकीं ॥ तारियेलीधरणी ॥ १ ॥ सुरवरपन्नगनिर्मुनियाजग ॥ नांदवीलोकतिन्हीं ॥ २ ॥ अंडजजारजस्वेदजउद्भिज ॥ निवडिलीयाखाणी ॥ ॥ ३ ॥ रात्रींसुधाकरताराउगवती ॥ दिवसातोतरणी ॥ ४ ॥ सत्तासूत्रेंवर्षतजळधर ॥ पीकपिकेधरणी ॥ ५ ॥ आपणतरीस्त्रीयेनिजनिर्गुण ॥ दासाहृद्भुवनीं ॥ ६ ॥

## पद १९.

गुरुदातारेदातारे ॥ अभिनवकैसेंकेलें ॥ ध्रु० ॥ एकचिवचनेंनबो-

ळतबोलुनि ॥ मानसविलयानेलें ॥ १ ॥ भूतसंगेंकृतनैश्वरवोझें ॥ निजबोधेंउतरिलें ॥ २ ॥ दासह्मणेमजमीपणविरहित ॥ निजपदींनांदविलें ॥ ३ ॥

## पद २०.

भावबळेंतरलेमानव ॥ ध्रु० ॥ सारासारविचारविलोकुनि ॥ भवहानिस्तरले ॥ १ ॥ रामनामनिरंतरवाचें ॥ निजपदींस्थिरले ॥ २ ॥ दासह्मणेसुखसागरडोहीं ॥ ऐक्यपणेंविरलें ॥ ३ ॥

## पद २१.

देहदंडिसीमुंडमुंडिसी ॥ भंडदाविसीनग्नउघडा ॥ ध्रु० ॥ भस्मलेपनेंतृणआसनें ॥ माळभूषणसोंगहेंमुढा ॥ १ ॥ अन्नत्यागेरेंहृद्‍योगेरे ॥ फटकायरेहिंडसीवनीं ॥ २ ॥ ऐकसांगतोरामदासतो ॥ ज्ञानयोगेरसाधितांबरें ॥ ३ ॥

## पद २२.

हेंकायतेंकाय ॥ योगकायभोगकाय ॥ ध्रु० ॥ बाहेरजटाभारकाय ॥ अंतरींसंसारकाय ॥१॥ बाहेरकाषायवस्त्रदंडकाय ॥ आंतआवघेंमंडकाय ॥ २ ॥ बाहेरसात्विकध्यानकाय ॥ आंतमद्यपानकाय ॥ ॥ ३ ॥ रामदासह्मणेपाहे ॥ व्यर्थभगलकरूनकाया ॥ ४ ॥

## पद २३.

मिश्रितसारासार ॥ अरेनिवडीतोचिचतुर ॥ ध्रु० ॥ ब्रह्मनिरंजनअद्वयसत्य ॥ मायाजनपरद्वैतअनित्य ॥ १ ॥ मेळविलेंजळअमृतदोनी ॥ हंसजसापयवेनिवडोनि॥२॥पारखीविणखरेंनिवडेना ॥ मढ-

कसेंजनहितकळेना ॥ ३ ॥ दासह्मणेनिजकौतुकमोठें ॥ अनुभवबोलतीशाब्दिकखोटें ॥ ४ ॥

## पद २४.

पळापळाब्रह्मपिसायेतोजवळी ॥ रामनामेंहाकदेउनीडोईकाडोळी ॥ ध्रु० ॥ वृत्तिशेंडीबंधनेंविणरादामोकळी ॥ संसाराचीधुळीकरुनिअंगींउधळी॥१॥प्रपंचउकरड्यावरीबैसणेंज्याचें॥ भोंवतापाळाफिरोनिपाहेजनहेअविद्येचे ॥२॥ धाउनिबैसेउठोनिपळेदृश्यवाटतें ॥ अदृश्याचेंरहाणेंघेतांनचलेकवणाचें ॥ ३ ॥ आउतहाटगजनवावाइउतळले ॥ दाहावाठावह्मणऊनतेथेंठिगळदिधलें ॥ ४ ॥ ऐसेंमनहेंचंचळनिवृत्तीसीगंतुलें ॥ परतुनियाआलेंह्मणउनिजीवेंचिमारिलें ॥ ५ ॥ मीपणाचेंशहाणपणजळालेंमाझें ॥ कोणवाहेदेहबुद्धीवस्त्रांचेंओझें ॥६॥ नलगेंआह्मामानअपमानाचेंओझें ॥ तुझेंशुद्धीघेतांगेलेंमीपणमाझें ॥७॥ आह्मीजनधनदेखुनिविचारकरितों ॥ आपणऐसेंपिसेह्मणऊनिउमजधरितों ॥ ८ ॥ अर्थेंभेटोंयेतीत्यासवेडलावितों ॥ रामींरामदासऐसेंअबद्धबोलतो ॥ ९ ॥

## पद २५.

कल्याणधामारामाकल्याणधामा ॥ ध्रु० ॥ दुःखनिवारणनामकसुखाये ॥ सुखमूर्तीगुणग्रामारामा ॥ १ ॥ दासउदासकरीतवकृपा ॥ अभिनवनामगरिमारामा ॥ २ ॥

## पद २६.

तूंयेरेरामा ॥ कायवर्णूमहिमा ॥ ध्रु० ॥ सोडविलेदेवतेतीसकोटी॥ तेवींसोडवीआह्मा ॥ १ ॥ रामलक्ष्मणभरतशत्रुघ्न ॥ पुढेंउभाहनुमा-

न ॥ २ ॥ दासह्मणेभवबंधनिवारी ॥ रामागुणधामा ॥ ३ ॥

पद २७.

हेराघवादेईतुझेंभजन ॥ ध्रु० ॥ अनुतापत्यावरीभक्तियोग ॥ मानितीहेसज्जन ॥ १ ॥ कीर्तनकरावेंनामउच्चरावें ॥ अंतरीलागो ध्यान ॥ २ ॥ दासह्मणेमनआत्मनिवेदन ॥ सगुणसमाधान ॥ ३ ॥

पद २८.

नाममंगळधामहरीचेंहो ॥ संतसज्जनाविश्राम ॥ ध्रु० ॥ सकळधर्मअचळ ॥ अर्थकामस्मरणेंस्वानंदाभिराम ॥ १ ॥ गरळजाळशमशिवमनोरम ॥ दासउदासपूर्णकाम ॥ २ ॥

पद २९.

संगतसाधूचीमजजाहाली ॥ अक्षयपदवीआली ॥ ध्रु० ॥ सर्व मीसर्वात्माऐसी ॥ अंतरींदृढमतीझाली ॥ जागृतीसहीतअवस्थातुर्या ॥ स्वरूपींसमूळविराली ॥ १ ॥ बहुजन्मांचीजपतपसंपत्ती ॥ विमळफळेंसिआली ॥ मीमाझेंहेसरलीममता ॥ समुळींभ्रांतीनिमाली ॥ २ ॥ रामींअभिन्नदासऐसी ॥ हेजाणीवसमूळहीगेली ॥ नचळेनढळेअचळ कृपाहे ॥ श्रीगुरुरायेंकेली ॥ ३ ॥

पद ३०.

अणुपासुनिजगदाकार ॥ ठणठकाररघुवीर ॥ ध्रु० ॥ रामाकार जाहालीवृत्ती ॥ दृश्यादृश्यनयेहाती ॥ १ ॥ रामींहारपलेंजग ॥ दास ह्मणेकैचेंमग ॥ २ ॥

पद ३१.

शतशतकरवंशींअवतरणा ॥ दशमुखकुलसंहरणा ॥ दशशत-

वदनाग्रजरूपमदना ॥ दशरथनृपनंदनगुणसदना ॥ ध्रु० ॥ कौसल्यात्मजनिजसुखकरणा ॥ कौशिकमखपालनशिवस्मरणा ॥ राजिवलोचनजानकीरमणा ॥ भवचिंताहरणा ॥ १ ॥ निजचरणींअहिल्याउद्धरणा ॥ भार्गववीरक्षितीपाळाहारमर्दना ॥ वालीकार्मुकभरणा ॥ अंजनिसुतसेवितवचरणा ॥ २ ॥ दशदिशाव्यापकगुणसगुणा ॥ आत्मारामसमस्ताभरणां ॥ जीवकदंबकपातसंस्मरणा ॥ रामदासवंदेतवचरणा ॥ ३ ॥

## पद ३२.

रामाविसरावेंमगकासयाजगावें॥स्वहितदुरीतेंव्हांदुःखपाळवींध्यावें॥ वरवकुंभपाकअहोरात्रभोगावे ॥ तेथवांकोणसोडीवमेनपडेठावें ॥ध्रु०॥ जनींकानकोंडेरामनह्मणेतोंडें ॥ आदळेंदुःखआंगींभोगभोगितांरडे ॥ कर्तृत्वआपुलेंचिकैसेंनाठवेवेडें ॥ देवासीबोलठेवीकेवींस्वसुखजोडे ॥१॥ विषयींचित्तगोंवी ॥ हृदयस्थनाठवीकामक्रोधलोभसंगें ॥ त्रासनुपजीवीं ॥ ममतादुःखपरीआपणातेंवाहवी ॥ विनवीरामदासभवसागरतरवी ॥ २ ॥

## पद ३३.

साजिरेंहोरामरूपसाजिरेंहो ॥ ध्रु० ॥ रूपप्रगटलेंलावण्यलाजिरें ॥ मानसींबैसलें ॥ १ ॥ सर्वांगींसुंदरठाणमनोहर ॥ दासाचाआधार ॥ २ ॥

## पद ३४.

देखिलाहोराघवदेखिला ॥ ध्रु० ॥ रूपरामाचेंलावण्यसाचें ॥ ध्यानविश्रामाचें ॥ १ ॥ चंचळमानसपाहेवास रामींरामदास ॥ २ ॥

## पद ३५.

शरणमीराघवाहो ॥ ध्रु० ॥ अंतरध्यानागुणनिधाना ॥ मजपहा हो ॥ १ ॥ भजनकांहींघडतनाहीं ॥ हेंसाहाहो ॥ २ ॥ रामदास धरूनकास ॥ येकभावो ॥ ३ ॥

## पद ३६.

रेमानवाउगीचआमुचीजिणी ॥ आह्माध्यानींभेटिचीशिराणी॥ध्रु०॥ नरापरीसवान्नरभले ॥ जिहींडोळारामादेखियेलें ॥ १ ॥ ज्यासीरघुराजहितगुजबोले ॥ कोण्याभाग्येंभगवंतभेटलें ॥ २ ॥ रामींमिनलेते असोनिचयाती ॥ त्यांच्याचरणाचीवंदीनमाती ॥ नित्यनव्हाळीगाऊनिकरूंकिती ॥ तेंणरघुनाथींउपजेलप्रीती ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणेएकाकरूं ॥ यारेआह्मीतैसाचिभावधरूं ॥ भक्तीप्रेमाचादावूंनिर्धारू ॥ तेणेंआह्माभेटलरघुविरू ॥ ४ ॥

## पद ३७.

कैचेंघरकैचेंदार ॥ मिथ्यासकळहीव्यापार ॥ अंतींसोइरारघुवीर॥ कांभुललासी ॥ १ ॥ कोणीनव्हेकोंरेकोणाचीं ॥ सकळहीसांगातिदैवाचीं ॥ धरीसोयत्यारामाची ॥ कांभुललासी ॥ २ ॥ बहुअवघड आहेवाट ॥ कैसीनकळेउरकेलवाट ॥ होईरघुविरजीचाभाट ॥ कां भुललासी ॥ ३ ॥ फिरमाघारापरतोनपाहे ॥ एकधर्मचीहोउनिराहे॥ धनजोडिलेंनराहे ॥ कांभुल० ॥ ४ ॥ ऐसीकरावीत्राजोडी ॥ राहे येथेंतेथेंगोडी ॥ सोडीमिथ्याप्रपंचवोढी ॥ कांभुल० ॥ ५ ॥ केव्हां जाईलनकळेश्वास ॥ राहेतेंधरपडेलवोस ॥ येकडीयाउपजेलत्रास ॥ ॥ कांभु० ॥ ६ ॥ सावधहोईरेत्राणेसा ॥ वोढींजळतेघरींचावासा ॥

स्मरमाझ्यारमाधीशा ॥कांभु०॥७॥ संसारपाण्याचाबुडबुडा॥याचानको करूंतोओढा ॥ तूंसमजेसीनामूढा ॥ कांभु० ॥ ८ ॥ करीसीताराम-मैत्र ॥ होईलदेहतुझापवित्र ॥ वरकडभिंतीवरीलचित्रें ॥ कांभु०॥९॥ कांरेबैसलासानिश्चळ ॥ करीशिलअनर्थासमूळ ॥ सांडुनीविश्रांतीचें स्थळ ॥ कांभु० ॥ १० ॥ मुख्यअसूंद्यावीदया ॥ नाहींतरसर्वही जाईलवायां ॥ मिठीघालीरामपाया ॥ कांभु० ॥ ११ ॥ करिशील डोळ्याचाअंधार ॥ पाहेजनासीनिर्वैर ॥ सांडीधनसंपत्तीचेंवारें॥कांभु० ॥ १२ ॥ अंगींधनसंपत्तीचेंवारें ॥ खायामिळतीलभुतेंपोरें ॥ कामा नयेतरेनिर्धारें ॥ कांभु० ॥ १३ ॥ रामदासाचेंजीवन ॥ तूंकांनक-रिसीसाधन ॥ रामतोडीलभवबंधन ॥ कांभु० ॥ १४ ॥

## पद ३८.

चातुरचातुरसेचटका ॥ ध्रु० ॥ एकएकगुणपरवाडीडारू ॥ तन भरीतोरीगयातटका ॥ १ ॥ सुनतदेखतगुनप्रगटलोकनमें ॥ आजब लागेचटका ॥ २ ॥ रामदाससमाही सबघटव्यापक ॥ लेतआनंदकी चुटका ॥ ३ ॥

## पद ३९.

बाईमीहोमीहोजाहलीखरी ॥ खरीगुरुदास ॥ अखिलपदार्थीउ-दास ॥ ध्रु० ॥ इहपरनश्वरजाणुनिहृदयीं ॥ आलासेबहुत्रास ॥१॥ नित्यानित्यविवेकविचारुनि ॥ सेवितोंब्रह्मरसास ॥ २ ॥ तुर्याउल्लं-घुनिउन्मनीसेवुनी ॥ स्वस्वरूपींनिजवास ॥ ३ ॥ निजतृप्तीसीदेउनि तृप्ति ॥ केलाअनुभवग्रास ॥ ४ ॥ रामदासप्रभुनित्यउदास ॥ स-चरणींविश्वास ॥ ५ ॥

## पद ४०.

आवडतोप्रियपरीगवसेना ॥ ध्रु० ॥ स्वजनाहुनिप्रियदेहआपुला ॥ तोहिविटेपरीआपणविटेना ॥ १ ॥ ज्यावरीधांवतींइंद्रियेंमनही ॥ सर्वहीदावुनिआपणदिसेना ॥ २ ॥ श्रीगुरुदास्यअनन्यघडेजरि ॥ अनुभवतंतुकधींहीतुटेना ॥ ३ ॥

## पद ४१.

कोणमीमजकळतचीनाहीं ॥ सारासारविचारशोधुनीपाही ॥ १ ॥ नारीह्मणोंतरीनरचीभासे ॥ नरह्मणोंतरीसमूळविनासे ॥ २ ॥ दास ह्मणोंतारिरामचिआहे ॥ रामह्मणोंतरिनामनसाहे ॥ ३ ॥

## पद ४२.

आतांतरिजायजायजायधरीसद्गुरुचेपाय ॥ ध्रु० ॥ संकल्पविकल्प मोडुनीराहेदृढधरुनीपायपायपाय ॥ १ ॥ नामस्मरणज्यामुखींनाहीं त्याणेंवांचुनीकायकायकाय ॥ २ ॥ मानवतनूहीनयेमागुनीबरेंविचा रुनिपाहेपाहेपाहे ॥ ३ ॥ आत्मानात्मविचारनकरितांव्यर्थप्रसवली मायमायमाय ॥४॥ सहस्त्रअन्यायजरीत्वांकेलेकृपाकरीलगुरुमायमा माय ॥ ५ ॥ रामदासह्मणेनामस्मरणेंभिक्षामागुनिखायखायखाय । आतांतरि० ॥ ६ ॥

## पद ४३.

अरेनरसारविचारकसा ॥ ध्रु० क्षीरनीरएकहंसनिवडिती ॥ का कळेवायसा ॥ १ ॥ मायाब्रह्मएकसंतजाणती ॥ सारांशघेतीतसा॥२ दासह्मणेवंद्यनिंद्यवेगळें ॥ कर्मानुसारठसा ॥ ३ ॥

## पद ४४.

अरेमनपावनदेवधरीं ॥ अनहीतनकरी ॥ ध्रु० ॥ नित्यानित्यविवेककरावा ॥ बहुजनाउद्धरी ॥ १ ॥ आत्माकोणअनात्माकैसा ॥ परपारउतरी ॥ २ ॥ दासह्मणेतुझातूंचिसखारे ॥ हिततुझेंतूंकरी॥३॥

## पद ४५.

अरेनरसारवीचारकरी ॥ मनबरेंविवरी ॥ ध्रु० ॥ सारासारविचारनयेतां ॥ वाहासीभवपुरीं ॥ १ ॥ सकळचराचरकोठुनिजाहलें ॥ कोठेंनिमालेंतरी ॥ २ ॥ दासह्मणेजरीसमजमीतरी ॥ मुळींचीसोय धरी ॥ अरेनर० ॥ ३ ॥

## पद ४६.

भूतकाळींकर्मकेलेंवर्तमानींआलें ॥ त्याचेंसुखमानूनियाभोगितोंआपुलें ॥ ध्रु० ॥ सुखदुःखभोगजहालातोचिमागीलठेवा ॥ आतांदुःखमानूंनकोकरीरामसेवा ॥ १ ॥ बाइलमेलीपोरमेलेंद्रव्यनाहींगांठीं ॥ तळमळलागलीजीवांकारेहोशीकष्टी ॥ २ ॥ जेंजेंदुःखहोतेंजिवातेंचिमागीलकर्म ॥ आतांत्याचेंसुखमानीस्मररामनाम ॥ ३ ॥ नामाविणराहूनकोअसाफजितहोशी ॥ पुन्हांघडीनयेबापानरकामध्येंजाशी ॥ ४ ॥ भविष्याचाधोकातुझेहातामध्येंआहे ॥ पळभरविसरूनकोनाहींकोणी साह्य ॥ ५ ॥ सावधहोईसावधहोईकितीसांगूंतुजला ॥ परिणामकठिणमोठाशरणजाइगुरुला ॥ ६ ॥ दासह्मणेझालेंतेंतरीहोऊनियागेलें ॥ नकोनकोह्मणतांहिभोगविंतेंकेलें ॥ भूतकाळीं० ॥ ७ ॥

## पद ४७.

येकलाजगदांतरजाहला ॥ आणीककोणीचनाहींतयाला ॥ १ ॥

